"महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६).

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१८/प्र.क्र.३३८/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २.०२.२०१९.

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३३/२९३/२०१८-१९, दिनांक २३.०५.२०१८.
२) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३३/३५४/२०१८-१९, दिनांक १.०५.२०१८.
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २.०४.२०१८.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ५.०६.२०१८
५) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३३/५५९/२०१८-१९, दिनांक २.०७.२०१८.
६) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३३/१३५२/२०१८-१९, दिनांक १.११.२०१८.
७) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २५.०१.२०१९.

**प्रस्तावना :**

"महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) सदरची योजना सन २०१७-१८ पासून योजनेत्तर मधून योजनांतर्गत वर्ग करण्यात आलेली आहे. सन २०१८-१९ साठी सदर योजनांतर्गत एकूण रु. ४००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या उपरोक्त दिनांक २३.०५.२०१८ रोजीच्या पत्रान्वये अनुसूचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे या योजने अंतर्गत अमरावती वनवृत्तासाठी रु. ०.५० लक्ष, यवतमाळ वनवृत्तासाठी रु.१७५.९२ लक्ष, ठाणे वनवृत्तासाठी रु. ५०.०० लक्ष व चंद्रपूर वनवृत्तासाठी रु. ११.७५ लक्ष (एकूण २३८.१७ लक्ष) व दिनांक २.०७.२०१८ रोजीच्या पत्रान्वये गडचिरोली वनवृत्तासाठी रु. ५१.४६ लक्ष रकमेचा नवीन / चालू बाब प्रस्ताव शासनास मंजूरी तथा निधी वितरणासाठी सादर केला आहे. तर दिनांक १.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये औरंगाबाद वनवृत्तासाठी रु. २०.०० लक्ष निधी सदर योजनेअंतर्गत यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीतील शिल्लक अनुदानातून भागविण्यास शासनाची मंजूरी देण्याबाबत विनंती केली आहे.

वित्त विभागाच्या दिनांक २५.०१.२०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार, अर्थसंकल्पीत निधीच्या खर्चाची मर्यादा महसूली लेख्यातील अनिवार्य खर्चाच्या बाबीवन ९० % व कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबीवर ८० % तसेच

भांडवल लेख्यातील अनिवार्य खर्चाच्या बाबीवर ९० टक्के व कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबीवर १०० टक्के निधीचे वितरण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्यानुसार अर्थसंकल्पित असलेल्या रु. ४००.०० लक्ष (०२ मजूरी- रु. २२.०० लक्ष व ५० इतर खर्च - रु. ३७८.०० लक्ष) निधी पैकी ८० % च्या मर्यादेत रु. ३२०.०० लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध असून त्यापैकी रु. २८०.०० लक्ष निधी संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता वितरणासाठी उपलब्ध असलेला रु. ४०.०० लक्ष निधी वितरित करण्याची तसेच संदर्भ क्र. ६ अन्वये विनंती केल्यानुसार औरंगाबाद वनवृत्तासाठी आवश्यक रु. २०.०० लक्ष निधी यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीतील शिल्लक अनुदानातून भागविण्याच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

सन २०१८-१९ करिता "महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवट दारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या योजनेअंतर्गत एकूण रु. ४००.०० लक्ष अर्थसंकल्पीत निधीच्या ८० % मर्यादेत प्रस्तावांतर्गत यवतमाळ व गडचिरोली वनवृत्तासाठी प्रस्तावानुषंगाने मागणी केलेल्या रुपये रु. ७५.६३ लक्ष निधी पैकी रुपये **४०.०० लक्ष** (०२ मजूरी- रु. २.२० लक्ष + ५० इतर खर्च रु. ३७.८० लक्ष) इतका निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास तसेच औरंगाबाद वनवृत्तासाठी आवश्यक असलेला रु. २०.०० लक्ष इतका निधी यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीतील शिल्लक अनुदानातून भागविण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे :-

| अ.क्र | वनवृत्त | प्रस्तावित रक्कम (रु. लाखात) | दिनांक ५.०६.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित रक्कम (रु. लाखात) | वितरित रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | अमरावती | ०.५० | ०.५० | ० |
| २ | यवतमाळ | १७५.९२ | १५१.७५ | २४.१७ |
| ३ | ठाणे | ५०.०० | ५०.०० | ० |
| ४ | चंद्रपूर | ११.७५ | ११.७५ | ० |
| ५ | नागपूर | ६६.०० | ६६.०० | ० |
| ६ | गडचिरोली | ५१.४६ | - | १५.८३ |
| **एकूण एकंदर** | | **३५५.६३** | **२८०.००** | **४०.००** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.
२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.
३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.
४) सदर मान्यता ही सन २०१८-१९ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक - सी-७, २४०६ वनीकरण व वन्य जीवन ८०० इतर खर्च, (०१) इतर खर्च, (०१) (०५) "महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१८-१९ मध्ये

मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २.०४.२०१८ रोजीचे परिपत्रक आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०२१६१२२३३११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.02.02 16:13:14 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ/ गडचिरोली/ औरंगाबाद.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.